राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत जिल्हा परिषदा आणि ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता समित्यांना प्रशासकीय खर्चासाठी अनुज्ञेय असलेल्या निधीबाबत सुधारित निर्देश

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापाधो-१११९/प्र.क्र.१३४/पापु-०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय प्रशासकीय इमारत
मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख: २० फेब्रुवारी, २०१५.

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१००२/प्र.क्र.५३२/पापु-०७, दिनांक २३ मार्च, २००२.
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापापु-१००५/प्र.क्र.१३/पापु-०७, दिनांक १८ फेब्रुवारी, २००५.
३) **शासन निर्णय क्रमांकः** ग्रापाधो-११०९/प्र.क्र.११५/पापु-०७, दिनांक ०९ सप्टेंबर, २००९.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणी करिता तांत्रिक सेवा पुरवठादारांची नियुक्ती करण्यात येत होती. तांत्रिक सेवा पुरवठादारांना त्यांच्या सेवेसाठी प्राकलणे व आराखड्याप्रमाणे (Plan and Estimates) मंजूर प्रकल्प खर्च किंवा योजनेवर अंतिम रित्या झालेल्या कामावरील प्रत्यक्ष एकूण खर्च यापैकी जी रक्कम कमी असेल त्या खर्चाच्या २ टक्के पर्यंत प्राकलणे व आराखडे शुल्क आणि ५ टक्के पर्यंत प्रकल्प व्यवस्थापन व तांत्रिक सल्ला शुल्क देण्यात येत होते. त्यानंतर संदर्भाधीन शासन निर्णय क्रमांक ३ नुसार ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी तांत्रिक सेवा पुरवठादारांऐवजी कंत्राटी अभियंत्यांची नियुक्ती करण्याच्या सूचना देण्यात आल्या आहेत. या कंत्राटी अभियंत्यांचे मानधन व भत्ते यांचा खर्च जिल्हा परिषदांकडे जमा झालेल्या २ टक्के आणि ५ टक्के निधीतून करण्यात येतो. या खर्चाव्यतिरिक्त शिल्लक राहणा-या निधीतून करावयाच्या खर्चासाठी शासनाची मान्यता घेणे आवश्यक आहे. तथापि, ब-याच जिल्ह्यांमध्ये कंत्राटी अभियंत्यांची नियुक्ती करण्याची आवश्यकता नसल्याने हा निधी मोठ्या प्रमाणात अखर्चित राहतो, तसेच ज्या जिल्हा परिषदांनी कंत्राटी अभियंत्यांच्या नियुक्त्या केलेल्या आहेत अशा जिल्हा परिषदांमध्ये कंत्राटी अभियंत्यांच्या वेतन व भत्त्यावर खर्च होऊन देखील २ टक्के व ५ टक्के निधीमधून मोठ्या प्रमाणावर रकमा शिल्लक राहतात.

जिल्हा परिषदेकडील ग्रामीण पाणी पुरवठ्याच्या कामांसाठी तांत्रिक सेवा पुरवठादारांच्या सेवा खंडित केलेल्या असल्यामुळे ग्रामीण पाणी पुरवठा योजनेची अंदाजपत्रके तयार करण्यासाठी तसेच योजनेच्या देखरेखीसाठी स्वतंत्रपणे निधीची तरतूद करण्याची आवश्यकता नाही. त्यामुळे ग्रामीण पाणी पुरवठा योजनांसाठी केवळ प्रशासकीय खर्च अनुज्ञेय करून त्याची मर्यादा किती असावी तसेच या रकमेचा खर्च कोणकोणत्या बाबींसाठी अनुज्ञेय करावा याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेवून, जिल्हा परिषदेकडील ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची प्राकलणे व आराखडे तयार करण्यासाठी असलेल्या २ टक्के निधीची, योजनेच्या प्रकल्प व्यवस्थापन व तांत्रिक सल्ल्यासाठी असलेल्या ५ टक्के निधीची व प्रशासकीय खर्चासाठी असलेल्या २ टक्के निधीची तरतूद या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात येत आहे. या बाबींद्वारे जिल्हा परिषदांकडे शिल्लक असलेला संपूर्ण निधी हा राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी वापरण्यात यावा. शिल्लक असलेल्या निधीचा खर्च अन्य कोणत्याही बाबींसाठी अनुज्ञेय राहणार नाही.

०२. या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढे जिल्हा परिषदेकडील ग्रामीण पाणीपुरवठा योजनांसाठी एकूण प्रत्यक्ष कामाच्या खर्चाच्या रकमेच्या अधिकतम ४ टक्के मर्यादेपर्यंतचा खर्च प्रशासकीय कामासाठी अनुज्ञेय ठेवण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

०३. चालु आर्थिक वर्षाकरीता (सन २०१४-२०१५ करीता) प्रथम ४ टक्के प्रशासकीय निधी राखून ठेवण्यात यावा. हा ४ टक्के प्रशासकीय निधी राखून ठेवल्यानंतर उर्वरित रक्कम राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी वापरण्यात यावा. चालु आर्थिक वर्षाच्या लगतपुर्वीच्या वर्षापर्यंत (सन २०१३-२०१४ पर्यंत) शिल्लक असलेला संपूर्ण निधी ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या अंमलबजावणीसाठी वापरण्यात यावा. पुढील आर्थिक वर्षापासून (सन २०१५-२०१६ पासून) २ टक्के, ५ टक्के व २ टक्के अशी एकूण ९ टक्केची तरतूद रद्द करुन प्रशासकीय खर्चासाठी केवळ ४ टक्के निधी राखून ठेवण्यात यावा. या ४ टक्के प्रशासकीय निधीसाठी राष्ट्रीयकृत बँकेत स्वतंत्र खाते उघडण्यात यावे.

०४. वार्षिक कृती आराखडा तयार करताना मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी सदर प्रशासकीय खर्चाच्या रकमेची आवश्यकतेप्रमाणे गणना करून त्याची तरतूद करावी.

०५. ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीच्या स्तरावर आवश्यक असणारा प्रशासकीय खर्च हा या ४% प्रशासकीय खर्चाच्या तरतुदीमधूनच भागविण्यात यावा. ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीच्या स्तरावर होणाऱ्या प्रशासकीय खर्चाची प्रतिपूर्ती जिल्हा परिषदेमार्फत करण्यात यावी.

०६. परिच्छेद क्रमांक ०४ मध्ये नमूद केल्यानुसार जिल्हा परिषदेकडे उपलब्ध होणाऱ्या प्रशासकीय निधीचा विनियोग पुढीलप्रमाणे करण्यात यावा:-

(१) ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीमार्फत होणाऱ्या पाणी पुरवठा योजनांच्या प्रशासकीय खर्चाची प्रतिपूर्ती करणे.

(२) कंत्राटी अभियंत्यांचे मानधन, प्रवास भत्ते व भ्रमणध्वनी भत्ते या बाबींवर खर्च करणे.

(३) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाअंतर्गत जिल्हा स्तरावर व उप विभाग स्तरावर कार्यरत असलेल्या कंत्राटी डाटा एंट्री ऑपरेटर यांचे मानधन अदा करणे.

(४) जिल्हा स्तरावरील ग्राम पाणी पुरवठा विभाग/उप विभाग याकरिता नियमित वाहन उपलब्ध नसल्यास भाडेतत्वावर वाहन उपलब्ध करून घेणे. (प्रतिमाह रु.४०,०००/- मर्यादेपर्यंत)

(५) पाणी पुरवठा योजनेच्या सर्वेक्षणासाठी आवश्यक साधन सामुग्री/ मनुष्यबळ उपलब्ध करून घेणे.

(६) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परीक्षणाचा खर्च करणे.

(७) पाणी पुरवठा योजनेची प्राकलने व आराखडे तयार करण्यासाठी आवश्यक असलेली स्टेशनरी, टंकलेखन, बायडिंग व झेरॉक्स इ. बाबींवर खर्च करणे.

**(८) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांचे सनदी लेखापालाकडून (CA) लेखापरीक्षण करणे-** ग्रामीण पाणी पुरवठा योजनांची सनदी लेखापालाकडून (CA) लेखापरीक्षण करून घेण्याची जबाबदारी जिल्हा परिषदांची राहील.

(९) ग्रामीण पाणी पुरवठा कार्यालयाच्या इंटरनेट व दूरध्वनी सुविधेची बिले अदा करणे.

(१०) जिल्हा परिषदेच्या ग्रामीण पाणी पुरवठा विभागासाठी संगणक व प्रिंटर उपलब्ध करून घेणे; मुख्य कार्यकारी अधिकारी/ कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जिल्हा परिषद यांना पाणी पुरवठा योजनेच्या कामाकरिता शासनाच्या विहित पद्धतीनुसार लॅपटॉप उपलब्ध करून घेणे.

**उपरोक्त बाबींव्यतिरिक्त अन्य बाबींवर खर्च करण्यासाठी शासनाची मान्यता घेणे आवश्यक आहे.**

०७. सदर तरतूद फक्त राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमासाठी खर्च होईल, याची खात्री करण्याची जबाबदारी मुख्य कार्यकारी अधिकारी आणि कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषदा यांची राहील.

०८. प्रस्तुत शासन निर्णय हा नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.६७४/व्यय-०३, दि.१३ नोव्हेंबर,२०१४ अन्वये प्राप्त अभिप्रायास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

०९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201502201209495628 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SAVRIKAR AJAY KISHANRAO

Digitally signed by SAVRIKAR AJAY KISHANRAO
DN: CN = SAVRIKAR AJAY KISHANRAO, C = IN, S = Maharashtra, O = WATER SUPPLY AND SANITATION DEPARTMENT, OU = WATER SUPPLY AND SANITATION,CID - 917821
Date: 2015.02.20 14:03:46 +05'30'

**(अजय सावरीकर)**
**उपसचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.विधीमंडळ सदस्य (सर्व), विधानभवन, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. विभागीय आयुक्त (सर्व),
९. संचालक, भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.
१०.जिल्हाधिकारी (सर्व),
११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा (सर्व),

१२.संचालक, समाज कल्याण संचालनालय, पुणे.
१३.संचालक, पाणी व स्वच्छता सहाय्य संस्था, बेलापुर, नवी मुंबई.
१४.महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
१५.महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता),
१८. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण
१९. अधिक्षक अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/भारत निर्माण कक्ष
२०. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषदा (सर्व),
२१. मंत्रालयीन सर्व विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व क्षेत्रीय कार्यालये
२२. पाणी पुरवठा विभागातील सर्व पर्यवेक्षीय अधिकारी/सर्व कार्यासने
२३. निवड नस्ती (कार्यासन पापु-०७)